**प्रशासकीय मान्यता प्रदान करणेबाबत.**

**सचिव, मराठी भाषा विभाग यांच्या नवीन प्रशासकीय भवन, ९ व्या मजला येथील दालनाच्या विद्युत कामाच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देणे...**

**महाराष्ट्र शासन**

**मराठी भाषा विभाग**

**शासन निर्णय क्रमांक - समभा-२०१९/प्र.क्र.९१/ नों.शा.**

नवीन प्रशासन भवन, ८ वा मजला,
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई - ४०००३२
दिनांक :- १२ नोव्हेंबर, २०२०

**संदर्भ :-** शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग क्र. शाकाजा-१११९/प्र.क्र. १३६/२०१९/२२, दि.२२.११.२०१९ नुसार

**प्रस्तावना :-**

सचिव, मराठी भाषा विभाग यांच्याकरीता मंत्रालयातील अन्य विभागांच्या सचिवांप्रमाणेच बैठक व्यवस्था उपलब्ध नसल्याने संदर्भीय शासन निर्णयान्वये सचिव, मराठी भाषा विभाग यांच्याकरीता नविन प्रशासकीय भवनातील ९ व्या मजल्यावरील पश्चिम बाजूस असलेल्या एकूण १११३.३२ चौ.फु. जागेचे वाटप करण्यात आले आहे. सदर जागेत मंत्रालयातील अन्य विभागांच्या सचिवांप्रमाणेच अंत:कक्ष (प्रसाधनगृहासह), स्वीय सहायक, लिपिकांसह अतिथींची बसण्याची व्यवस्था व विभागाची सभा घेण्यासाठी २५ ते ३० व्यक्ती बसू शकतील असा समिती कक्ष बनविणे आवश्यक आहे. त्याकरीता विद्युत कामाचे रू.१६,८१,११०/- (रू.सोळा लक्ष ऐक्याऐंशी हजार एकशे दहा मात्र) इतक्या रकमेचे अंदाजपत्रक (सर्व करांसहीत) तांत्रिक मान्यतेसह सादर केले आहे. सदर अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

सचिव, मराठी भाषा विभाग यांच्या दालनाकरीता मंत्रालयातील अन्य विभागांच्या सचिवांप्रमाणेच अंत:कक्ष (प्रसाधनगृहासह), स्वीय सहायक, लिपिकांसह अतिथींची बसण्याची व्यवस्था व विभागाची सभा घेण्यासाठी २५ ते ३० व्यक्ती बसू शकतील असा समिती कक्ष बनविण्याकरीता विद्युत कामाच्या रू.१६,८१,११०/- (रू.सोळा लक्ष ऐक्याऐंशी हजार एकशे दहा मात्र) इतक्या अंदाजपत्रकास (सर्व करांसहीत) प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

२. यावर होणारा खर्च सार्वजनिक बांधकाम विभागास समायोजित करण्याच्या अटीच्या अधीन राहून सद्य:स्थितीत सार्वजनिक बांधकाम विभागाकडे देखभाल दुरूस्तीसाठी उपलब्ध असलेल्या निधीतून करण्यात यावा, अशा सूचना अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, मुंबई यांना सार्वजनिक बांधकाम विभागाच्या दिनांक १७.१२.२०१९ च्या पत्रान्वये देण्यात आल्या आहेत.

३. वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३ विनियम भाग-२ दिनांक २०.०९२०१९ च्या शासन निर्णयातील भाग एक उपविभाग-५ परि क्र. १३४(१) , १३४(२) आणि १३४(३) नुसार तसेच सार्वजनिक बांधकाम विभाग, शासन परिपत्रक क्र. संकिर्ण-२०१९/प्र.क्र.१०/इमा-२, दिनांक २५.०९.२०१९ मध्ये नमुद करण्यात आलेल्या अटीच्या अधीन राहून तसेच प्रशासनिक विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरून हा शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२०१११२१६११४१३२३३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SUPRIYA KISHANRAO GHOTALE

Digitally signed by SUPRIYA KISHANRAO GHOTALE
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=fef4727e7e9784dac57e77ec93428316b1d6f2525552e0cb821f7697eaf74007, postalCode=400032, street=MANTRALAYA,MUMBAI, serialNumber=303c0731b4f8dfb924149f646828c3458ed7b0ebf9d144882376273f83eb8b80, ou=NA, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=SUPRIYA KISHANRAO GHOTALE
Date: 2020.12.15 14:06:47 +05'30'

**( सु. कि. घोटाळे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव, राज्यपाल भवन, मुंबई,
२. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई,
३. मा. मंत्री (मराठी भाषा) यांचे विशेष कार्य अधिकारी, मंत्रालय, मुंबई,
४. मा. मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
५. मा. विरोधी पक्ष नेता विधानपरिषद/ विधानसभा, विधानभवन, मुंबई,
६. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई,
७. महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखापरीक्षा/ लेखा व अनुज्ञेयता), मुंबई, नागपूर
८. महालेखापाल, महाराष्ट्र-२ (लेखापरीक्षा/ लेखा व अनुज्ञेयता), मुंबई, नागपूर
९. सचिव, मराठी भाषा विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई,
१०.सचिव (इमारती), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई,
११.कार्यकारी अभियंता यांचे कार्यालय, कृषी बांधकाम विभाग क्र.५(वि), सार्वजनिक बांधकाम विभाग, बांधकाम भवन, पाचवा मजला, मर्झबान रोड, फोर्ट, मुंबई-४०० ००१
१२.अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
१३.निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
१४.सर्व अवर सचिव/ कक्ष अधिकारी, मराठी भाषा विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
१५. निवडनस्ती-नों.शा.